**विभागीय चौकशीचे परिपूर्ण प्रस्ताव पाठविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**परिपत्रक क्र.** विभाचौ २००९/प्र.क्र. १७ /सा.अ.(२)
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक - २२ जून २००९.

**परिपत्रक**

अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव व विशेष चौकशी अधिकारी-२ यांचेकडे राज्यसेवेतील वरिष्ठ गट - अ दर्जाच्या रु.१२००० व त्यावरील वेतनश्रेणीतील अधिका-यांच्या विभागीय चौकशीची प्रकरणे प्रशासकीय विभागाकडून चौकशीसाठी सोपविली जातात. त्यामध्ये खालील दोष दिसून येतात.

१. सद्या सोपविलेल्या प्रकरणातील काही प्रकरणांमध्ये संबंधित प्रशासकीय विभागानी सुमारे ३ ते ५ वर्षापूर्वी दोषारोपपत्रे बजावलेली आहेत. सदरची प्रकरणे सेवानिवृत्त वरिष्ठ अधिका-यांकडे सोपवून ती निकाली काढण्यासाठी सन २००७ मध्ये संबंधित प्रशासकीय विभागांकडे परत पाठविण्यात आलेली होती. परंतु काही प्रशासकीय विभागांकडून काहीच कार्यवाही न होता ती प्रकरणे विशेष चौकशी अधिकारी-२ यांचेकडे सन २००८ मध्ये परत पाठविली गेली. विभागीय चौकशी दीर्घकाळ प्रलंबित राहिल्याने अपचारी अधिकारी मॅट कडे धाव घेतात व मॅटकडून संबंधित विभागांना प्रकरण निकाली काढण्यासाठी फारच अल्पकालावधी दिला जातो. अशावेळी विभागीय सचीव या कार्यालयावर चौकशी अहवाल लवकर पूर्ण करणेसाठी दबाव आणतात. हे समर्थनीय नसून त्यामुळे विभागीय चौकशीचा दर्जा खालावण्याचा धोका देखील संभवतो. वास्तविक संबंधित प्रशासकीय विभागाने दोषारोपपत्र बजावल्यानंतर तेथूनपुढे ते प्रकरण लवकरात लवकर पूर्ण करण्याची जबाबदारी शिस्तभंगविषयक प्राधिकारी या नात्याने संबंधित प्रशासकीय विभागाची असते. या ठिकाणी प्रकरणातील विलंब हा प्रशासकीय विभागाने केलेला असतो परंतू अपचारी अधिकारी मॅट मध्ये गेल्यानंतर मॅटचे आदेशानुसार अत्यंत अल्प कालावधीत चौकशी पूर्ण करण्याची जबाबदारी मात्र विशेष चौकशी अधिका-यांवर येऊन पडते. परिणामी विशेष चौकशी अधिकारी-२ यांचेवर एकप्रकारचा मानसिक दबाव येतो. व प्रशासकीय विभाग मात्र नामानिराळा रहातो. विभागीय चौकशीचे अर्धन्यायिक स्वरुप व कार्यवाहीतील विविध टप्पे लक्षात घेऊन संबंधित प्रशासकीय विभागांव्दारे मॅटकडून किमान तीन महिने मुदतवाढ घेण्याची काळजी घेतली जात नाही.

२. प्रशासकीय विभागांकडून अधिका-यावर नियम ८ खाली दोषारोपपत्र बजावले जातात परंतू काही प्रकरणात असे निदर्शनास येते की, जरी हे दोषारोप सिध्द झाले तरी दोषारोपांचे स्वरुपच मुळी गौणशिक्षा देण्यायोग्य असते. अशा प्रकरणांमध्ये खरे तर प्रशासकीय विभागाने नियम १० खाली कार्यवाही करणे आवश्यक असते. परंतु प्रशासकीय विभाग नियम ८ खाली चौकशी सुरु करुन आपले काम व जबाबदारी टाळण्याचा प्रकार केला जातो.

३. विभागीय चौकशी नियम पुस्तिकेतील नियम क्र.३.११.(२) मध्ये खालीलप्रमाणे तरतूद आहे.

"ज्या प्रकरणात विभागीय चौकशी आवश्यक आहे अशाच प्रकरणात विभागीय चौकशीचा आदेश दिला गेला आहे अणि जेव्हा ती नितांत आवश्यक नसेल तेव्हा त्याबाबत आदेश देण्यात आलेला नाही याविषयी खात्री करुन घेण्यासाठी शिस्तभंगविषयक प्राधिका-याने विभागीय चौकशीचा आदेश देण्यापूर्वी दोषारोपांचा काळजीपूर्वक अभ्यास करावा आणि त्यासाठी नियम ८ अथवा नियम १० मध्ये निर्देशिलेल्या प्रकारच्या शिक्षा लादण्याची आवश्यकताआहे , याविषयी खात्री झाल्यानंतरच विभागीय चौकशीचा आदेश द्यावा".

कृ.मा.प.

विभागीय चौकशी नियम पुस्तिकेतील नियम क्र.३.१४.(१) मध्ये खालीलप्रमाणे तरतूद आहे.

अ. "कसूरदार शासकीय कर्मचा-याने महारष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम ८ (५) अन्वये सादर केलेले बचावाचे लेखी निवेदन मिळाल्यानंतर त्याची तपासणी करुन दोषारोपांच्या बाबींचे पुर्नविलोकन करण्याच्या आणि त्यात सुधारणा करण्याच्या किंवा काही दोषारोप किंवा सर्व दोषारोप वगळण्याच्या अंगभूत शक्ती शिस्तभंगविषयक प्राधिकारणास आहेत".

ब. "कसूरदार शासकीय कर्मचा-याने कबूल न केलेल्या परंतू त्याने दिलेल्या बचावाच्या लेखी विवरणाच्या आधारावर विभागीय चौकशी करण्याचे कारण नाही, अशी शिस्तभंगविषयक प्राधिकरणाची खात्री झाली असेल अशा दोषारोपांमध्ये चौकशी करण्याकरीता चौकशीअधिकारी नेमणे शिस्तभंगविषयक प्राधिकरणावर बंधनकारक असणार नाही."

वरील तरतूदीप्रमाणे शिस्तभंगविषयक प्राधिकारी दोषारोपांचा व अपचा-याच्या बचावाचा काळजीपूर्वक अभ्यास न करता व स्वविवेक न वापरता (not applying own mind) प्रकरण चौकशी अधिका-यांकडे सोपवितात. यामुळे संबंधित अपचा-याला मनस्ताप सहन करावा लागतोच शिवाय चौकशी अधिकारी व चौकशी प्रकरण हाताळणारे अधिकारी व कर्मचारी यांचा नाहक वेळ वाया जातो. म्हणून शिस्तभंगविषयक प्राधिका-याने सोबतच्या नमुन्यातील **प्रमाणपत्र** प्रस्तावासोबत पाठवावे.

४. वरील बाबीव्यतिरिक्त असेही अनुभवास आले आहे की, असे प्रस्ताव पाठविताना प्रशासकीय विभागाकडून विभागीय चौकशी नियमावलीतील कार्यपध्दती विषयक नियमही लक्षात घेतले जात नाहीत. उदा.

१. दोन किंवा त्यापेक्षा अधिक अपचारी असतील तर नियम १२ खालील आदेश निर्गमित केले जात नाहीत.
२. दोषारोप मुद्देसूद नसतात. दोषारोपांमध्ये व्दिरुक्ती असते. दोषारोपांसोबतची जोडपत्र-१ व जोडपत्र-२ एकसारखीच असतात. जोडपत्र-१ मध्ये दोषारोपांचे संक्षिप्त विवरण तर जोडपत्र-२ मध्ये विस्तृत विवरण असणे आवश्यक असते.
३. जोडपत्र-३ मध्ये जे साक्षीदार नमूद केले जातात त्यातील काही साक्षीदार प्रकरणाशी संबंधितच नसतात अथवा योग्य त्या साक्षीदाराचे नाव समाविष्ट केलेले नसते.
४. जोडपत्र-४ मधील दस्तऐवज प्रस्तावासोबत पाठविले जात नाहीत. पाठपुरावा करुनसुध्दा ते लवकर पाठविले जात नाहीत अथवा क्षेत्रीय कार्यालयाकडे पत्रव्यवहार केला जातो. एका प्रकरणात तर कागदपत्रे उपलब्ध नसतानादेखील विभागीय चौकशी आदेशीत केल्याचे आढळून आले.
५. अपचा-याचे बचावाचे लेखी निवेदन प्रस्तावासोबत नसते ते अपचा-याने सादर केले नसेलतर तसे स्पष्ट केले जात नाही. एका प्रकरणात असे आढळून आले की अपचा-याने बचावाच्या लेखी निवेदनात सबळ पुराव्यांनिशी दोषारोपांचे खंडन केले होते तरी देखील प्रशासकीय विभागाने दोषारोप मागे न घेता प्रकरण चौकशी अधिका-यांकडे सोपविण्याचा निर्णय घेतला.

तरी विभागीय चौकशी करण्याचे प्रस्ताव पाठविताना प्रशासकीय विभागांनी वर नमूद केलेल्या सर्व बाबी लक्षात घेऊन परिपूर्ण प्रस्ताव सोबत जोडलेल्या **तपासणीसूची (Check list)** नुसार विशेष चौकशी अधिकारी-२ यांचेकडे चौकशीसाठी सोपवावेत.

**( लीना मेहेंदळे )**
**अपर मुख्य सचिव विशेष चौकशी अधिकारी-२**
**सामान्य प्रशासन विभाग.**

कृ.मा.प.

प्रति,

१. मा.मुख्यसचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
२. अ.मु. स./ प्र.स. / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
३. स.स. व सा.अ.२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय.
४. निवडनस्ती (साअ-२)
५. साअ-२ कार्यासन यांचे संग्रहार्थ,

-----------------

## तपासणीसूची ( check list )

१. चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांच्या नियुक्तीचे आदेश. (दोन प्रतीत.)
२. दोषारोप ज्ञापन. (जोडपत्र १ ते ४) , ( चार प्रतीत )
३. समायिक कारवाई असेल तर नियम १२ खालील आदेश. (२ प्रतीत)
४. जोडपत्र ४ मधील कागदपत्रांचे सुस्पष्ट व स्वाक्षांकित संच (३ प्रतीत)
५. जोडपत्र ३ मधील साक्षीदारांचे अद्ययावत पत्ते, दूरध्वनी / भ्रमणध्वनी क्रंमाक,
६. अपचारी शासनसेवेत असल्यास त्याचा कार्यालयीन पत्ता व दूरध्वनी / भ्रमणध्वनी क्रमांक अथवा सेवानिवृत्त असल्यास त्याचा घरचा अद्ययावत पत्ता, दूरध्वनी क्रंमाक.
७. जोडपत्र ४ मधील दस्तऐवज व जोडपत्र ३ मधील साक्षीदार कोणत्या दोषारोपांशी संबंधित आहेत याचे खालीलप्रमाणे विवरण . (२ प्रतीत)

| दोषारोप क्रमांक | संबधित दस्तऐवज | संबधित साक्षीदार |
|---|---|---|
| १ | २ | ३ |

८. अपचा-याचे बचावाचे लेखी निवेदन. (२ प्रतीत) नसल्यास तसे स्पष्ट करावे.
९. सहायक सादरकर्ता अधिका-याचे नियुक्तीचे आदेश .
१०. प्रकरण नियम ८ खाली चौकशी करण्यायोग्य असल्याचे शिस्तभंगविषयक प्राधिका-याचे विहीत नमून्यातील प्रमाणपत्र.

## प्र मा ण प त्र

प्रमाणित करण्यात येते की, ---------------- यांचेविरुध्द बजावण्यात आलेले दोषारोप, त्या अनुषंगाने जोडपत्र ३ मधील कागदपत्रे व --------यांची बचावाची निवेदने ही कागदपत्रे स्वविवेकाने (By applying own ming ) तपासून मी या निष्कर्षाप्रत आलो/आले आहे की, ----------------- यांचेविरुध्द म.ना.से. (शिस्त व अपील) नियम १९७९ मधील नियम - ८ खाली विभागीय चौकशी करणे आवश्यक आहे व दोषारोपांचे गांभीर्य इतके आहे की, ते नियम ८ खालील जबर (Major) शिक्षेस पात्र राहतील.

**दिनांकः**

( )

**विभागाचे सचिव**